**सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गातील अधिकाऱ्याची बदलीने पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२१/प्र.क्र.९२ /फ-८.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ :-** महसूल व वन विभाग, शासन आदेश क्रमांक एमएफएस-२०२१/प्र.क्र.७०/फ-८ दि.०६ ऑगस्ट, २०२१

**शासन आदेश :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (२) व ४ (४) मधील तरतुदीनुसार श्री. गणेश निवृत्ती पाटोळे सहायक वनसंरक्षक-१, सामाजिक वनीकरण, अमरावती यांना संदर्भाधीन दि.०६/०८/२०२१ रोजीच्या शासन आदेशान्वये सहायक वनसंरक्षक (मुल्यांकन-१) मुल्यांकन विभाग यवतमाळ या पदावर प्रशासकीय कारणास्तव बदली देण्यात आली होती.

२. श्री. पाटोळे बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नाहीत. त्यांनी पुणे विभागात वैद्यकीय कारणास्तव पदस्थापना देण्यासाठी विनंती केली होती. तसेच मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर येथे मुळ अर्ज क्र. ६३९/२०२१ दाखल केला होता. श्री. पाटोळे यांना संदर्भाधीन शासन आदेशान्वये दिलेल्या पदस्थापनेमध्ये अंशत: बदल करुन खालील प्रमाणे विनंतीनुसार बदलीने पदस्थापना सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | बदलीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|
| १ | श्री. गणेश निवृत्ती पाटोळे, सहायक वनसंरक्षक-१, सामाजिक वनीकरण, अमरावती | सहायक वनसंरक्षक (वन्यजीव-१) चांदोली राष्ट्रीय उद्यान, विभागीय वन अधिकारी (वन्यजीव) यांचे कार्यालय स्थित कराड | रिक्त पदी |

३. श्री. पाटोळे यांना पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. श्री. पाटोळे पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर माहिती सादर करावी.

४. संबंधित अधिकाऱ्याला शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्याला मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०२२३१३५६०५४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, pseudonym=F47821202A3D8C06F80E6240CB6E122AFEEDD6F5, serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2022.02.23 13:58:32 +05'30'

**(आनंदा शेंडगे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक /सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव)
९. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर
१०. सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण
११. सर्व उपवनसंरक्षक
१२. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२

१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१५. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक.
१६. संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत.
१७. निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.